**केंद्र पुरस्कृत व राज्याच्या योजनेचे सनियंत्रण करण्यासाठी राज्यात कार्यक्रम सनियंत्रण व मुल्यमापन प्रणाली (Performance Monitoring & Evaluation System [PMES]) लागू करणे व त्या अनुषंगाने फलनिष्पत्ती दस्तावेज (Result-Framework Document [RFD]) तयार करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१०१०/प्र.क्र.३५/१८ (र. व का.),
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १० नोव्हेंबर २०१०

**प्रस्तावना :-**

२०१०-११ हे वर्ष महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेचे ५० वे वर्ष आहे. त्या निमित्ताने राज्य शासनाने जनतेच्या अपेक्षा पूर्ण करुन राज्याचा वेगाने विकास करण्यासाठी विविध योजना सुरू केल्या आहेत. व काही योजना शासनाच्या विचाराधीन आहेत. गेल्या ५० वर्षात कृषी, उद्योग, पायाभूत सुविधा, रोजगार निर्मिती, आरोग्य, शिक्षण इत्यादी क्षेत्रामध्ये राज्य देशामध्ये अग्रेसर राहिले आहे. अनेक राज्य तसेच केंद्र सरकार देखील महाराष्ट्र शासनाच्या योजनांचे अनुकरण करुन ज्या योजना राबवित आहेत त्यात रोजगार हमी योजना, माहितीच्या अधिकाराचा कायदा याचा विशेष उल्लेख करता येईल.

२. सुवर्ण जयंती वर्षामध्ये नागरिकांच्या अपेक्षा पूर्ण करण्याच्या दृष्टीने एकीकडे नवनवीन उपक्रम योजना राबविण्याचा शासनाचा विचार आहे. त्याचबरोबर सध्या सुरु असलेल्या योजनांचे पुर्नविलोकन करुन त्यामध्ये सुधारणा करणे गरजेचे आहे. जुन्या व नवीन योजनांच्या अंमलबजावणीच्या सनियंत्रण व्यवस्थेमध्ये देखील सुधारणा करणे आवश्यक आहे.

३. शासनाच्या जाहीर ध्येय धोरणानुसार राज्यात अंमलात आणलेल्या व आणावयाच्या योजना/कार्यक्रमांची प्रभावी अंमलबजावणी करणे आवश्यक आहे. याकरिता अशा योजना/कार्यक्रमांच्या प्रभावी अंमलबजावणीत पारदर्शकता, उत्तरदायित्व, कार्यक्षमता आणि

फलनिष्पत्ती यांचे प्रभावी सनियंत्रण आवश्यक आहे. त्याचप्रमाणे पारदर्शकता व जनतेशी बांधिलकी या हेतूने त्याचे प्रकटीकरण करणेही आवश्यक आहे.

४. केंद्र पुरस्कृत व राज्यातील योजनांचा आढावा घेता, अनेकदा असे दिसून येते की, संबंधित विभागांच्या पातळीवर त्या त्या योजनांवर किती खर्च झालेला आहे याकडे लक्ष दिले जाते, भौतिक उद्दिष्टपूर्ती तसेच योजनेच्या अंमलबजावणीमधील गुणवत्ता याकडे पण लक्ष देणे तेवढेच महत्त्वाचे असून योजना राबवून योजनेचा अंतिम उद्देश सफल झाला की नाही याचे योग्य असे मुल्यमापन होणे आवश्यक आहे. केंद्र शासनाच्या विविध मंत्रालयाकडून राबविण्यात येणाऱ्या योजनांची/कार्यक्रमांची फलश्रुती याचे सनियंत्रण करण्याकरिता केंद्र शासनाच्या मंत्रीमंडळ सचिवालयामध्ये कार्यक्रम सनियंत्रण व मुल्यमापन प्रणाली (Performance Monitoring& Evaluation System [PMES]) गेल्या वर्षापासून सुरु करण्यात आली आहे. ही प्रणाली राज्यात लागू करण्याची विनंती केंद्र शासनाने केली आहे. तद्नुषंगाने मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकरिता कार्यशाळा व चर्चासत्रे आयोजित करण्यात आली .

५. केंद्र पुरस्कृत व राज्याच्या योजनांचे सनियत्रण करण्याकरिता कार्यक्रम सनियंत्रण व मुल्यमापन प्रणाली [Performance Monitoring& Evaluation System (PMES)] लागू करणे व त्या अनुषंगाने फलनिष्पत्ती दस्तावेज [Result-Framework Document (RFD)] तयार करणे ही योजना राज्यात लागू करण्याबाबत दिनांक ६.१०.२०१० रोजी झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आली, त्यानुसार शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय

राज्याच्या शासकीय विभागात केंद्र शासनाच्या धर्तीवर कार्यक्रम सनियंत्रण व मुल्यमापन प्रणाली [Performance Monitoring & Evaluation System (PMES)] लागू करणे व त्या अनुषंगाने फलनिष्पत्ती दस्तावेज [Result-Framework Document (RFD)] लागू करण्यास शासन या आदेशाद्वारे मान्यता देत आहे.

२. केंद्र पुरस्कृत व राज्याच्या योजनांचे प्रभावी अंमलबजावणीच्या सनियंत्रणाकरिता केंद्र शासनाने सुरु केलेली कार्यक्रम सनियंत्रण व मुल्यमापन प्रणाली (पी.एम.इ.एस) [Performance Monitoring & Evaluation System (PMES)] तात्काळ लागू करण्यात यावी.

३. २०१०-११ या वित्तीय वर्षात, प्रत्येक विभागाचे सचिव यांनी शासनाच्या ध्येय धोरणानुसार आपल्या विभागात राबविण्यात येणाऱ्या केंद्र पुरस्कृत/राज्य योजनेचे प्राधान्यक्रम व त्यातील उद्दिष्ट निर्धारित करुन विहित प्रपत्रातील फलनिष्पत्ती आधारित दस्तावेज (Result-Framework Document [RFD]) तात्काळ तयार करुन त्यास मंत्रीमहोदयांची मान्यता घ्यावी, व त्या योजनांचा आढावा व मूल्यमापन सुरु करावे.

४. सन २०११-१२ पासून कार्यक्रम सनियंत्रण व मुल्यमापन प्रणाली (पी.एम.इ.एस.) [Performance Monitoring & Evaluation System (PMES)] ची अंमलबजावणी करण्याकरिता पुढील आर्थिक वर्षासाठी प्रत्येक विभागाच्या सचिवांनी विभागाच्या मंत्रिमहोदयांच्या मान्यतेने मिळणारा संभाव्य नियतव्यय व अर्थसंकल्पातील तरतुदीच्या आधारे फलनिष्पत्ती आधारित दस्तावेज [Result-Framework Document (RFD)] दिनांक ३१ मार्च पर्यंत तयार करावे.

५. प्रत्येक विभागाने २०११-१२ या आर्थिक वर्षाचे फलनिष्पत्ती आधारित दस्तावेज [Result-Framework Document (RFD)] विभागाचा अर्थसंकल्प मान्य झाल्याबरोबर संकेतस्थळावर ३० एप्रिलपर्यंत प्रसारित करावे, जेणेकरुन विभागाच्या कामाचे सनियंत्रण प्रक्रियेत सुलभता व पारदर्शकता येईल.

६. प्रत्येक विभागाने फलनिष्पत्ती आधारित दस्तावेज [Result-Framework Document (RFD)] नुसार (उद्दिष्ट/कार्यक्रम अंमलबजावणीबाबत)आर्थिक वर्षात प्रत्येक तिमाहीनंतर व वर्षाअखेर आढावा घ्यावा व आढाव्याचा अहवाल सामान्य प्रशासन विभाग ( रचना व कार्यपध्दती) मार्फत उच्चाधिकार समिती यांना पाठवावी. प्रत्येक विभागाचे फलनिष्पत्ती आधारित दस्तावेज [Result-Framework Document (RFD)] नुसार सामान्य प्रशासन विभाग (रचना व कार्यपध्दती) तिमाहीनंतर व सहामाहीनंतर उच्चाधिकार समिती आढावा घेऊन विभागाच्या RFD मधील नमूद उद्दिष्ट व कार्यक्रम व त्यांच्या अंमलबजावणीमध्ये आवश्यकतेनुसार अनुरुप सुधारणा सूचित करेल.

७. वर्षाअखेर सर्व विभागानी RFD अंतर्गत उद्दिष्टपूर्ततेचा अहवाल तयार करावा व त्याची एक प्रत उच्चाधिकार समिती व सामान्य प्रशासन विभाग ( रचना व कार्यपध्दती) यांना पाठवावी. उच्चाधिकार समितीने सदर अहवालाची छाननी करुन तिचा अहवाल मंत्रीमंडळाला सादर

करावा.तसेच सदर मान्यतेनंतर प्रत्येक विभागाने पूर्तता अहवाल सविस्तर कारणमिमांसा सहीत विभागाच्या संकेतस्थळावर जूनपर्यंत प्रस्तावित करावे. ज्या बाबीची पूर्तता झालेली नाही, त्यासंदर्भात सविस्तर खुलासा स्पष्टीकरणासह प्रसिध्द करावा.

८. वरीलप्रमाणे आढावा घेण्यासाठी खालीलप्रमाणे उच्चाधिकार समिती गठीत करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| मुख्य सचिव | अध्यक्ष |
| प्रधान सचिव (वित्त ) | सदस्य |
| प्रधान सचिव , मुख्यमंत्री सचिवालय | सदस्य |
| महासंचालक, यशदा | सदस्य |
| प्रधान सचिव, नियोजन | सदस्य |
| सचिव, मुख्यमंत्री सचिवालय | सदस्य |
| सचिव, उप मुख्यमंत्री कार्यालय | सदस्य |
| सचिव (प्र.सु.व र.व का.) | सदस्य सचिव |

९. विभागाचे वार्षिक योजना/अंदाजपत्रक तयार करीत असताना फलनिष्पत्ती आधारित दस्तावेज (Result-Framework Document [RFD]) अंतर्गत निर्धारित प्राथम्यक्रम विचारात घेण्यात यावा.

१०. कार्यक्रम सनियंत्रण व मुल्यमापन प्रणाली (Performance Monitoring & Evaluation System [PMES])अंतर्गत विविध विभागाच्या कामकाजाचे शासनाच्या ध्येयधोरणानुसार उद्दिष्टपूर्तीबाबतचे मुल्यमापन स्वतंत्र यंत्रणेमार्फत देखील करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

११. सनियंत्रण व मुल्यमापन प्रणाली [Performance Monitoring & Evaluation System (PMES)] व्यवस्थापन व त्याअंतर्गत फलनिष्पत्ती आधारित दस्तावेज [Result-Framework Document (RFD] यांचे सनियंत्रण सामान्य प्रशासन विभाग (रचना व कार्यपध्दती) यांचेकडून करण्यात येईल. माहिती व तंत्रज्ञान विभागामार्फत Online फलनिष्पत्ती आधारित दस्तावेज (Result-Framework Document [RFD]) कार्यान्वित करण्याचे काम संगणक क्षेत्रातील नामांकित कंपनीकडून करुन घेण्यात येईल. त्याकरिता वार्षिक अंदाजे रु.३० लाख इतक्या खर्चास मंजूरी देण्यात येत आहे. माहिती व तंत्रज्ञान विभागाने वरीलप्रमाणे RFD च्या डेटाचे

संकलन,देखभाल, पृथ्थकरण याकरिता संगणक क्षेत्रातील नामांकित कंपनीची नियुक्ती करण्याबाबतची कार्यवाही करावी.

१२. सध्या प्रत्येक विभागाला मराठी व इंग्रजी RFD Online सादर करणे व शासनाच्या संकेतस्थळावर प्रकाशित करणे सुलभ व्हावे याकरिता माहिती व तंत्रज्ञान विभागाने भाषा संचालनालयाच्या सहाय्याने आवश्यक ती सर्व कार्यवाही तात्काळ करावी.

१३. हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१०१११०१५५४२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( जे. पी. डांगे )**
**मुख्य सचिव**

प्रति,

सर्व सन्माननीय संसद सदस्य/विधानमंडळ सदस्य,
राज्यपालांचे सचिव (५प्रती)
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव (५ प्रती)
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव (५प्रती)
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
मुख्य सचिवांचे कार्यालय,
*मा.महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य,
सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग (त्यांनी त्यांच्या अधिपत्याखाली असलेल्या सर्व विभागप्रमुख / कार्यालयप्रमुख यांच्या निदर्शनास वरील बाब आणावी.)
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई, (५ प्रती)
महाराष्ट्र विधानमंडळ, ग्रंथालय, विधानभवन, मुंबई.
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती

<u>* पत्राने</u>